**प्राथमिक व माध्यमिक शासकीय आश्रमशाळांमधील प्रभारी मुख्याध्यापक यांना आहारण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : शाआशा-२०१८/प्र.क्र.५१७/का.१३**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- २७ डिसेंबर, २०१८.

**वाचा** :- १) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र: अेएससी-१०९१/प्र.क्र.२०७१/का.१३, दि.२० ऑगस्ट, १९९२.

२) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र: शाआशा-२००६/प्र.क्र.९५/का.१३, दि.१९ ऑक्टोबर, २००६.

३) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र: शाआशा-२०१४/प्र.क्र.३८३/का.१३, दि.०५ जानेवारी, २०१५.

**प्रस्तावना:-**

आदिवासी विकास विभागांतर्गत राज्यातील डोंगराळ व दुर्गम भागातील सामाजिक/ शैक्षणिक दृष्टया मागासलेल्या आदिवासी जनतेच्या सर्वांगीण प्रगतीसाठी क्षेत्र विकासाचा दृष्टीकोन स्वीकारण्यात आला आहे. या कार्यक्रमातंर्गत आदिवासी क्षेत्राचा शैक्षणिक विकास होण्यासाठी आश्रमशाळा हा महत्वाचा केंद्र बिंदू आहे. त्यानुसार आदिवासी विद्यार्थ्यांना प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण देण्याच्या दृष्टीने आणि त्यांना समाजाच्या मुख्य प्रवाहात आणण्यासाठी आदिवासी विकास विभागांतर्गत एकूण ५५२ शासकीय आश्रमशाळा मंजुर असुन सद्यस्थितित ५०२ आश्रमशाळा चालविण्यात येत आहेत.

सदर शासकीय आश्रमशाळेतील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे वेतन व देयके, प्रवास भत्ता, भविष्यनिर्वाह निधी अग्रीम, उधारी देयके व इतर सर्व प्रकारची देयके पारीत करण्यासाठी मुख्याध्यापकांना उपरोक्त वाचा येथील शासन निर्णयांन्वये वेळोवेळी आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात आले आहे. परंतु, काही प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळांमध्ये मुख्याध्यापक रिक्त असल्यास अशा ठिकाणी प्रभारी मुख्याध्यापक म्हणून अतिरिक्त कारभार सोपविण्यात येतो.

तथापि, प्रभारी मुख्याध्यापक यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित केले नसल्यामुळे अशा वेळी कर्मचाऱ्यांची वेतना संबंधीत देयके व इतर बाबींसाठीची देयके कोषागार शाखेकडे पाठविण्यासाठी अडचण निर्माण होते त्यामुळे प्रभारी मुख्याधाक यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याबाबत शासन विचाराधीन होते. त्यानुसार शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

(१) आदिवासी विकास विभागांतर्गत असलेल्या प्राथमिक व माध्यमिक शासकीय आश्रमशाळेतील मुख्याध्यापक हे पद रिक्त असल्यास सदर पदावर प्रभारी मुख्याध्यापक म्हणून लेखी आदेशान्वये प्रकल्प अधिकारी यांचे स्वाक्षरीने अतिरिक्त कार्यभार सोपविला असल्यास अशा वेळी प्रभारी मुख्याध्यापकांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

(२) सदर शासन निर्णय संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी त्यांच्या अंतर्गत असलेल्या प्राथमिक व माध्यमिक शासकीय आश्रमशाळेच्या मुख्याध्यापकांच्या निदर्शसनास आणून त्याप्रमाणे पुढील योग्य ती कार्यवाही करण्याच्या सुचना द्याव्यात.

(३) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२२७१७१६२९८४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2018.12.27 17:21:54 +05'30'

**(सु. ना. शिंदे)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.४०० ०३२.

३. मा.मंत्री (आदिवासी विकास), मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२.

४. सर्व मा. मंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

५. मा. राज्यमंत्री (आदिवासी विकास), मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२.

६. सर्व मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

७. सर्व मा. विधानसभा सदस्य.

८. सर्व मा. विधानपरिषद सदस्य.

९. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

१०. मा. सचिव, आदिवासी विकास, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

११. मा. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.

१२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

१३. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.

१४. सर्व जिल्हाधिकारी.

१५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, आदिवासी विकास महामंडळ मर्या. नाशिक

१६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य नागपूर / नाशिक/ ठाणे / अमरावती.

१७. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.

१८. महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई

१९. महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.

२०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

२१. सर्व मुख्याध्यापक शासकीय प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळा (प्रकल्प अधिकारी यांच्या मार्फत)

२२. निवड नस्ती कार्यासन १३.